अस्थायी पदांचे स्थायी पदांत रुपांतर करण्यास मान्यता.
जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- अस्थायी - १२१५/४८६/प्र.क्र.२१४/कार्या-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक :-३० डिसेंबर,२०१६.**

वाचा :- १) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्र.अेएचसीटी-१००२/१२८९(१६२)-नऊ, दि. ०८.०९.२००३.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, क्र.एसआरव्ही-२००५/प्र.क्र.४७/०५/१२, दि.२५ ऑगस्ट, २००५.
३) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.टीईपी-२००२/प्र.क्र.१३/सेवा-३, दि.२१.०६.२००६
४) विधि व न्याय विभाग, शा.नि.क्र.अस्थायी-२००६/२०३०/(प्र.क्र.१३/०७)/का.११, दि.०२.८.२००७.
५) विधी व न्याय विभाग, शासन ज्ञापन क्र. अस्थायी-०११५/६२/प्र.क्र.२२/कार्या-११, दि.१०.०३.२०१५.
६) जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांचे पत्र क्र. प्रशा /२६३९/२०१५, दि.२४.०४.२०१५.
७) शासन निर्णय समक्रमांक दि.१२.०१.२०१६.
८) जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांचे पत्र क्र. प्रशा /२२३४/२०१६, दि.०६.०४.२०१६.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या उपरोक्त क्र.३ च्या शासन निर्णयानुसार ज्या विभागाने पदांचा आढावा पूर्ण केलेला आहे व आढाव्याअंती निश्चित केलेल्या आकृतीबंधास मुख्य सचिव समितीची मान्यता घेतलेली आहे, अशा विभागातील एकूण पदांच्या ८० % पदे कायम करण्यास अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. तथापि, उपरोक्त क्र.१ च्या शासन निर्णयानुसार न्यायिक आस्थापनांना पदविषयक आढावा घेण्याबाबत सूट देण्यात आली आहे.

जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांना विधि व न्याय विभागाच्या क्र. अस्थायी-२००६/२०३०/(प्र.क्र.१३/०७)/का.११, दि.२.८.२००७ च्या शा.नि.नुसार २०३ अस्थायी पदांपैकी ११७ अस्थायी पदांना स्थायी करण्यास मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांनी त्यांच्या आस्थापनेवरील आकृतीबंधानुसार असलेल्या एकूण १०१ अस्थायी पदांपैकी १९ अस्थायी पदांना स्थायी करण्याबाबत मागणी केली आहे. त्याअन्वये, जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे स्थायी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तथापी सदर पदांपैकी बेलिफ कम शिपाई हे पद ग्राम न्यायालयाचे असल्यामुळे संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णय अधिक्रमीत करुन पुढील प्रमाणे सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या उपरोक्त क्र.३ वरील दि.२१.०६.२००६ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांच्या आस्थापनेवरील एकूण १०१ अस्थायी पदांपैकी १७ **अस्थायी पदांना स्थायी** करण्यास पुढील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

## विवरणपत्र

| अ.क्र. | अस्थायी पदांचे पदनाम | स्थायी करण्यात आलेल्या पदांची संख्या |
|---|---|---|
| १. | अधिक्षक | १ |
| २. | लघुलेखक (निम्न श्रेणी) | २ |
| ३. | वरिष्ठ लिपिक | ३ |
| ४. | कनिष्ठ लिपिक | ६ |
| ५. | बेलिफ | १ |
| ६. | शिपाई-नि-पहारेकरी | ३ |
| ७. | पूर्णवेळ सफाईगार | १ |
| | **एकूण पदे** | **१७** |

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या क्र.टीईपी-२००२/प्र.क्र.१३/सेवा-३, दि.२१.०६.२००६ शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०७१६२५३७८२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neeraj Pradip Dhote

Digitally signed by Neeraj Pradip Dhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=LA Cum Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=714efbf760da6c143fdf63d5ec3da8a8957b82d41451a5f202043ce4895e4205, cn=Neeraj Pradip Dhote
Date: 2017.01.07 16:28:14 +05'30'

**( नी. प्र. धोंटे )**
**सह सचिव नि विधि सल्लागार, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा. राज्यमंत्री, विधी व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक,
३) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने),
४) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, रायगड-अलिबाग,
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
६) महालेखापाल, (लेखापरीक्षा)-१, मुंबई,
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड-अलिबाग,
११) वित्त विभाग, व्यय-६, सेवा-३, वित्तीय सुधारणा,
१२) विधी व न्याय विभाग, का- ६, २३ व २४,
१३) निवडनस्ती.